भारतीय प्रशासन सेवेतील नियुक्तीच्या प्रतिक्षेत असलेल्या अधिकाऱ्यांचे वेतन सामान्य प्रशासन विभागामार्फत अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एईओ-१०२०/प्र.क्र.१६४ /२०२०/दहा,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
तारीख: **२२.०८.२०२३**

**वाचा:** :- सामान्य प्रशासन विभाग यांचे आदेश क्र.एईओ-१०२०/प्र.क्र.१६४/२०२०/दहा, दि.०८.०६.२०२०.

**शासन निर्णय-**

भारतीय प्रशासन सेवेतील नियुक्तीच्या प्रतिक्षेत असलेल्या अधिकाऱ्यांचे वेतन सामान्य प्रशासन विभागामार्फत अदा करण्याकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने दिनांक ०८.०६.२०२० रोजीच्या आदेशान्वये धोरण ठरविले आहे.

२. भारतीय प्रशासन सेवेतील खाली नमूद करण्यात आलेले अधिकारी हे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकापासून नियुक्तीच्या प्रतिक्षेत आहेत:-

| अ.क्र. | भाप्रसे अधिकाऱ्यांचे नाव | नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्याचा दिनांक |
|---|---|---|
| १ | श्रीमती मनिषा वर्मा, भाप्रसे (१९९३) | ११.०७.२०२३ पासून |

३. तसेच श्रीमती मनिषा वर्मा, भाप्रसे यांना दिनांक २६.०६.२०२३ ते दिनांक १०.०७.२०२३ पर्यंत अर्जित रजा मंजूर करण्यात आली आहे. श्रीमती मनिषा वर्मा, भाप्रसे यांचे माहे जून, २०२३ चे वेतन कौशल्य विकास, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई या विभागामार्फत अदा करण्यात आले आहे.

४. त्यानुसार श्रीमती मनिषा वर्मा, भाप्रसे यांचे दिनांक ०१.०७.२०२३ ते दिनांक १०.०७.२०२३ पर्यंतचे रजा वेतन तसेच त्या नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्याच्या दिनांकापासून त्यांना प्रत्यक्ष पदस्थापना देईपर्यंतच्या कालावधीचे वेतन अदा करण्यासाठी, त्या नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्याच्या दिनांकापासून त्यांना प्रत्यक्ष नियुक्ती देईपर्यंतच्या कालावधीकरीता एक अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना सदर कालावधीचे वेतन सामान्य प्रशासन विभागांतर्गतच्या लेखाशिर्ष - मागणी क्रमांक ए-४, सचिवालय, सर्वसाधारण सेवा, ०९० सचिवालय (००) (०१), सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य), (०१), वेतन, (२०५२००२५) मधून अदा करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

५. वरीलप्रमाणे श्रीमती मनिषा वर्मा, भाप्रसे यांचे वेतन अदा करण्याबाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२६ (रोख शाखा) मार्फत करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारीक क्र.१५०९७, दिनांक ०९.०२.२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२११८०१३७६९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUCHITA MOHAN MAHADIK

Digitally signed by SUCHITA MOHAN MAHADIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=6578e224c4a0d2c9bfb7e7e33b474757c1425d0a03e653bc4f0a25b70698158e,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E146A6DDC8FB6681D49A5099661D41639DA6C568419F071BB9CDFD8A2E08058C,
cn=SUCHITA MOHAN MAHADIK
Date: 2023.08.22 11:43:56 +05'30'

**(सु.मो.महाडिक)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) महालेखापाल, मुंबई / नागपूर,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
८) सामान्य प्रशासन विभाग, ९, ९-अ, कार्यासन-२६ (रोखशाखा),
९) संबंधित अधिकारी,
१०) निवडनस्ती.